**“मुरबे, ता.जि.पालघर येथे पाईल जेट्टी बांधणे” या कामाच्या रु. १२, ३२,६०,२०८/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकिय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमआयएस ०८२१/प्र.क्र.२८/बंदरे-१**
गृह विभाग, मंत्रालय
मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ६ एप्रिल, २०२२

वाचा :- मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई यांचे पत्र क्र.
१) ममेबो/मुकाअ/अभि-१/२०२१-२२/२५७९, दिनांक १/७/२०२१
२) ममेबो/मुकाअ/अभि-१/ मुरबे/४३१७, दिनांक २१.१०.२०२१

प्रस्तावना:-

पालघर जिल्ह्यातील, मुरबे हे सातपाटी खाडी किनारी वसलेले गाव आहे. मुरबे येथे प्रवासी जेट्टी अस्तित्वात असून या जेट्टीवरुन सातपाटी येथे ये-जा करण्याकरिता स्थानिक वापर करतात. सद्यस्थितीत सातपाटी येथे पाईल जेट्टीचे काम हाती घेण्यात आले आहे. मुरबे येथील अस्तित्वातील जेट्टीची लांबी कमी असल्यामुळे ओहोटीच्या वेळी बोटी लागत नाहीत. त्यामुळे प्रवाशांना चढ-उतार करण्याकरिता अडचण अद्भवत असल्याने मुरबे येथे पाईल जेट्टी प्रस्तावित करण्यात आली आहे. "मुरबे, ता.जि.पालघर येथे पाईल जेट्टी बांधणे" या कामासाठी रु. १२,३२,६०,२०८/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकिय मान्यता प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

"मुरबे, ता.जि.पालघर येथे पाईल जेट्टी बांधणे" या कामासाठी रु. १२,३२,६०,२०८/-(अक्षरी रुपये बारा कोटी बत्तीस लक्ष साठ हजार दोनशे आठ) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकिय मान्यता देण्यात येत आहे.

२. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक :- विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७/४/२०१५ चे परिशिष्ट वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग-तीन अ.क्र.१ परिच्छेद क्र.२७ (२) (अ) मधील तरतूदींचे पालन होईल याबाबत महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांनी खात्री करावी.

३. वरील कामांवरील खर्च "मागणी क्र. बी-७, लेखाशीर्ष क्र.३०५१- बंदरे व दिपगृहे, (०२) लहान बंदरे, (१९०) सार्वजनिक उपक्रम व इतर उपक्रमांना सहाय्य, (००) (०२) महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास सहायक अनुदान-तरंगती जेट्टी व तत्सम प्रवाशी सुविधा उभारणे (३०५१ १८३५), ३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान" या लेखाशिर्षाखाली मंजुर तरतुदीतुन भागविण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.५/रा.मं.२, दिनांक ११.०२.२०२२, नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१४६१, दिनांक २१.०२.२०२२ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१३३/२०२२/व्यय-८, दिनांक २४.०३.२०२२ अन्वये निर्गमीत करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०४०७११४१०६१४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA MOTIRAM HOLKAR

Digitally signed by RAJENDRA MOTIRAM HOLKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ac1bf43d6978ca6d925e9240f8c09bf2f3128ad5d62a0dd7d57d2b72c9ea41f4, pseudonym=D247A5CA6B26BCB0990C6082FBF829BF9C8E55B1, serialNumber=48F41D082A9DD86B54CCCF5B4C6A83A6132C3F6F06A9940BD96061280 0458BA7, cn=RAJENDRA MOTIRAM HOLKAR
Date: 2022.04.07 11:41:50 +05'30'

**(रा. मो. होळकर )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (बंदरे) यांचे खाजगी सचिव
२. मा.राज्यमंत्री (बंदरे) यांचे खाजगी सचिव.
३. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई-३२.
७. नियोजन विभाग (का. १४६१), मंत्रालय, मुंबई-३२.
८. अपर मुख्य सचिव (बंदरे), मंत्रालय, मुंबई,
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई
१०. निवडनस्ती(बंदरे-१)